राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोगाचे सदस्य सचिव म्हणून करार पध्दतीने नियुक्ती करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग, (माहिती तंत्रज्ञान)**
**शासन निर्णय क्रमांक : मातंसं/१७१६/प्र.क्र.५४३/का.३९**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०६ जानेवारी, २०१७.

वाचा :- १) शासन अधिसूचना क्र.मातंस.१७१६/प्र.क्र.६३/३९ दि.२८.१०.२०१६.
२) शासन निर्णय क्रमांक मातंसं २०१६/प्र.क्र.३१५/का.३९, दिनांक २१ सप्टेंबर, २०१६.

**प्रस्तावना :-**

समाजाच्या हितासाठी, समाजाला भेडसावणा-या विविध प्रश्नांमध्ये, विज्ञान तंत्रज्ञानाच्या वापरात वाढ करणे, त्याचा प्रसार करणे आणि त्यास चालना देणे या उद्देशाने शासनाने राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोगाची स्थापना केलेली आहे. सदर आयोग हा स्वायत्त असून त्याच्या कामाची व्याप्ती विचारात घेऊन सन २००४ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १५ अनुसार सदर अध्यादेशामधील कलम ४ च्या (१) (ख) नुसार सदर आयोगामध्ये विविधांगी अनुभव असलेल्या वरीष्ठ शास्त्रज्ञांची आयोगाचे सदस्य सचिव म्हणून नेमणूक करण्याचे प्रयोजन करण्यात आले आहे.

२. वर नमूद अध्यादेशामधील कलम ४ (१) (ख) मधील तरतुदीनुसार संदर्भ क्रमांक २ मधील शासन निर्णयाप्रमाणे डॉ.अ.वि.सप्रे, सेवानिवृत्त वरिष्ठ वैज्ञानिक अधिकारी यांची नियुक्ती दिनांक १ ऑगस्ट, २०१६ ते ३१ डिसेंबर, २०१६ पर्यंत करण्यात आली होती. सदर कालावधी समाप्तीनंतर पुन्हा काही कालावधीसाठी डॉ.अ.वि.सप्रे यांची उक्त आयोगावर सदस्य सचिव म्हणून पुनर्नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

डॉ.अ.वि.सप्रे, सेवानिवृत्त वरिष्ठ वैज्ञानिक अधिकारी यांची राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोगाचे सदस्य सचिव म्हणून दिनांक १ जानेवारी, २०१७ ते ३१ मार्च, २०१७ पर्यंतच्या ३ महिन्यांच्या कालावधीसाठी पुनर्नियुक्ती करण्यात येत आहे. त्यांना अनुज्ञेय असलेल्या मानधनाबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१७०१०६१२०७५४९०११ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shubhangi Bharat Shedge
Digitally signed by Shubhangi Bharat Shedge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD (IT), postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a263d4760021d05a3b756165e3bb70be2ff107e40ff26cb633435468b5238f5e, cn=Shubhangi Bharat Shedge
Date: 2017.01.06 15:26:04 +05'30'

**( शु.भ.शेडगे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई

२. मा.राज्यमंत्री (सामान्य प्रशासन विभाग), मंत्रालय, मंबई-४०० ०३२.
३. अध्यक्ष, राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोग,
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
५. प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
६. प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
७. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. निवासी व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१०. वित्त विभाग, सेवा-६, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
११. डॉ.अ.वि.सप्रे, सदस्य सचिव, राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
१२. निवड नस्ती (का.३९).